आळंदी मध्यम प्रकल्प तालुका व जिल्हा नाशीकच्या आळंदी डावा तट कालव्याच्या सा.क्र.१४०८० मी. वरील ढापायुक्त मोरीच्या विशेष दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.आकाफु-२०१०/(३८५/१०)/सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २३/११/२०१०

पहा : १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जा.क्र.गोमपाविम/अकाफु/तां-५/६७९९, दि.१०.८.२०१०

**प्रस्तावना :-**

आळंदी डाव्या कालव्यावरील सा.क्र.१४०८० मी. वरील ढापामुक्त मोरीचे बांधकाम सन १९८७ साली करण्यात आले होते. या ढापायुक्त मोरीच्या अंत्याधाराचे बांधकाम व कालवा तळातील व सेवापथाकडील बांधकामाच्या अंत्याधार भिंती या दगडी बांधकामात व ढापा सलोह संधानकात बांधणेत आला होता. उन्हाळी आवर्तन सुरु असतांना आळंदी डाव्या कालव्यावरील साखळी क्रमांक १४०८०मी. वरील ढापायुक्त मोरीच्या अंत्याधाराचे बांधकाम व कालवा तळातील बांधकाम सेवापथकातील ढापा भरावासह तुटून खाली पडला. रब्बी हंगामातील ३०७० हे.क्षेत्र पुर्नस्थापित करण्यासाठी सदरहू ढापा मोरीचे नव्याने बांधकाम करणे अनिवार्य असल्यामुळे आळंदी मध्यम प्रकल्पाच्या डाव्या कालव्यावरील साखळी क्रमांक १४०८० मी.वरील ढापायुक्त मोरीच्या विशेष दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये आळंदी डाव्या कालव्यावरील साखळी क्रमांक १४०८०मी. वरील ढापायुक्त मोरीच्या विशेष दुरुस्तीच्या कामास सन २००८-०९ च्या दरसुचीवर आधारित रु.८१.०४ लक्ष (रुपये एक्क्याऐंशी लक्ष चार हजार) इतक्या रकमेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्यापैकी रु. ७३.६७ लक्ष (रुपये त्र्याहत्तर लक्ष सदूसष्ट हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रु. ७.३७ लक्ष (रुपये सात लक्ष सदतीस हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे.

१) वैधानिक मंडळाच्या कार्यक्षेत्रासाठी एकूण जो निधी निदेशानुसार उपलब्ध होतो त्याच्या २ टक्केच्या मर्यादेत तरतूदी विस्तार व सुधारणा कामासाठी असल्यास नवीन प्रकल्प(विस्तार व सुधारणा) सुरु करण्यात हरकत नाही, असे मा.राज्यपालांनी सूचित केले आहे. तरी या अटींचे तंतोतंत पालन करण्यात यावे. या अटीच्या अधीन राहून तसेच आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करणेत येत आहे.

२) या कामावर होणारा खर्च लेखाशिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्व साधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (१२) विस्तार व सुधारणा कार्यक्रमांतर्गत उर्वरीत महाराष्ट्र प्रदेशास भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) (१२)(०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १९४) या शिर्षाखाली टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग)क्र.विअप्र-१००४/प्र.क्र.३३/२००४/विनियम, दि.२९.११.२००५ मधील अ.क्र.भाग-१ मध्ये विहित केल्यानुसार जलसंपदा विभागास असलेल्या प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१०११२३१९४०४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( सं. दे. कुलकर्णी )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत :-

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
स्वीय सहाय्यक, मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपावि महामंडळ वगळून) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक,
अवर सचिव, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, नाशिक पाटबंधारे विभाग, नाशिक,
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,

